**वित्तीय मान्यता (२)**
**पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमीच्या नूतनीकृत संकूलाचा उदघाटन सोहळा, पु.ल.कला महोत्सव व महिला महोत्सव आयोजनाच्या खर्चास वित्तीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- पुलदे-२०२५/प्र.क्र.१७ (ई-९५९७१९)/सां.का. २**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ३१ मार्च, २०२५

वाचा : - १. संचालक पु.ल. देशपांडे यांचे पत्र जा.क्र.:पुलदे/आस्था/२०२५/३०० दि. १७/०३/२०२५
२. पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, शासन निर्णय क्र. पुलदे-२०२५/प्र.क्र.१७ (ई-९५९७१९)/सां.का.२, दि. २६.०३.२०२५.

**प्रस्तावना :**

संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांनी संदर्भ क्र.१ च्या पत्रान्वये केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभागाच्या प्रशासनिक नियंत्रणाखालील पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई कार्यालयाचा नूतनीकृत संकुलाचा उदघाटन सोहळा, पु.ल.कला महोत्सव व महिला महोत्सव हा ३ दिवसीय उद्धाटन सोहळा दिनांक २ मार्च २०२५ ते दिनांक ०४ मार्च २०२५ या कालावधीत आयोजित करण्यास व त्याअनुषंगाने झालेल्या रु. ९५,९४,९०१/- इतक्या प्रत्यक्ष खर्चाच्या प्रस्तावास उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये कार्योत्तर सुधारीत प्रशासकीय मान्यता व लेखाशीर्ष (२२०५ १४६३) (अनिवार्य) ५०- इतर खर्च अंतर्गत वित्त विभागाकडून उपलब्ध करुन देण्यात आलेल्या निधीच्या मर्यादेत म्हणजेच रु.८८,७५,००० इतक्या रकमेस वित्तीय मान्यता देण्यात आली होती.

आता उर्वरीत निधी रु. ७,१९,९०१/- ( अक्षरी रुपये सात लक्ष एकोनावीस नऊशे एक फक्त ) एवढा निधी वित्त विभागाने उपलब्ध करुन दिला आहे. त्यानुषंगाने उर्वरीत निधीस वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

दिनांक २ मार्च २०२५ ते दिनांक ०४ मार्च २०२५ या कालावधीत आयोजित करण्यात आलेल्या पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, प्रभादेवी, मुंबई कार्यालयाच्या नूतनीकृत संकुलाचा उद्धाटन सोहळा , पु.ल.कला महोत्सव व महिला महोत्सव अशा ३ दिवसीय उद्धाटन सोहळ्यासाठी झालेल्या रु.९५,९४,९०१/- खर्चाच्या अनुषंगाने उर्वरीत रक्कम ७,१९,९०१/- ( अक्षरी रुपये सात लक्ष एकोनावीस हजार नऊशे एक फक्त ) इतक्या खर्चाच्या प्रस्तावास सदर शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदरचा खर्च “मागणी क्र.झेडडी-०२, २२०५, कला व संस्कृती (००) (१०१) ललित कला शिक्षण (०७) (०१) पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी (२२०५ १४६३) (अनिवार्य) ५०- इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वित्तीय वर्षातील मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई यांना यासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून, त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास या संबधीच्या देयकावर स्वाक्षरी करण्यास प्राधिकृत करण्यात येत आहे.

०४. सदर शासन निर्णय वित्त विभाग क्र. वि.अ.प/२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग दोन, दि.१७ एप्रिल, २०१५ वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-एक, उप विभाग-तीन, अ.क्र.४, परिच्छेद २७ (२) (अ) नुसार प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२५०३३११६१४४४८४२३ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PARSRAM
NANDRAM BAHURE

Digitally signed by PARSRAM NANDRAM BAHURE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=ef62741544bc4d8832eecfb2b7ea295e8a6fcdfe9faffcfda201c87e1c73881b, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=5FD2A6873F4AE5B1D9EA7DD52E449E02A942EA90145BAEAB72C63CED6D659844, cn=PARSRAM NANDRAM BAHURE
Date: 2025.03.31 16:15:46 +05'30'

**(परसराम बहुरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य) यांचे स्वीय सहायक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. संचालक, पु.ल.देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई.
३. अवर सचिव/कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. अवर सचिव/कक्ष अधिकारी (सां.का.२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. उप सचिव (सां.का.२), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल लेखा परीक्षा/ लेखा अनुज्ञेयता महाराष्ट्र-१, मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
९. निवडनस्ती, सां.का.२.